औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे सेवेत राहण्यासाठी पात्रअपात्रता अजामावण्यासाठी विभागीय पुनर्विलोकन समितीची स्थापना.....

महाराष्ट्र शासन
उद्योग, उर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय, क्रमांकः औसुवआ- १११४/प्र.क्र. ७१/काम-१
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०१५

वाचा:-

१) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक : एसआरसी-१०७९/३०३-१५, दि.२४/१०/१९७९.
२) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक : एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दि.१२/०५/१९८६.
३) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक : एसआरसी-१०८८/प्र.क्र.५/१५, दि.२८/०८/१९९०.
४) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक : एसआरसी-१०८९/प्र.क्र.३३८९/१५, दि.१४/०१/१९९२.
५) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक : विपुस-१०९२/प्र.क्र.२०/९२/१५, दि.१८/१०/१९९३.
६) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक : विपुस-१०९७/प्र.क्र.१३६/९७/१५, दि.१९/०६/१९९८.
७) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक : विपुस-१०९९/प्र.क्र.५८/९९/१५, दि.१६/०९/१९९९.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ च्या नियम १० (४) व नियम ६५ अनुसार सार्वलनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी / कर्मचारी यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकरी सेवा कालावधी पूर्ण झाल्यावर, यापैकी जे अगोदर घडेल तेव्हा, सेवेत राहण्याची पात्रापात्रता (पात्र/अपात्र) आजमाविण्याच्या दृष्टीने त्यांचे पुनर्विलोकन करुन सुयोग्य व कार्यक्षम अधिकारी / कर्मचारी यांना शासन सेवेत पुढे चालू ठेवावे व अकार्यक्षम तसेच संशयास्पद सचोटी असणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे.

२. सदर पुनर्विलोकन धोरणानुसार, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयामधील पुनर्विलोकनास पात्र होणाऱ्या गट अ व गट ब मधील अधिकारीऱ्यांना वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे किंवा अर्हताकरी सेवेची ३० वर्षाची सेवा झाल्यावर, त्यांची सेवेत राहण्याची पात्रापात्रता (पात्र/अपात्र) आजमाविण्याच्या दृष्टीने त्यांचे पुनर्विलोकन करुन शिफारस करण्यासाठी नियमानुसार आवश्यक ती पुढील कार्यवाही करण्यासाठी पुढीलप्रमाणे विभागीय पुनर्विलोकन समिती स्थापन करण्यात येत आहे :-

| विभागीय पुनर्विलोकन समिती | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव / सचिव (कामगार) | अध्यक्ष |
| २ | सह सचिव (कामगार) | सदस्य |
| ३ | सह सचिव / उप सचिव (कामगार) | सदस्य |
| ४ | अवर सचिव (कामगार-१) | सचिव |

३. पूर्वपृष्ठावरील पुनर्विलोकन समितीचे कामकाज शासनाने पुनर्विलोकनाविषयी विहित केलेल्या निकषांनुसार / कार्यपध्दतीनुसार राहिल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०११६२०४३२०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Khavnekar Jayashree A

Digitally signed by Khavnekar Jayashree A
DN: CN = Khavnekar Jayashree A, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Industry energy & labour department
Date: 2015.04.01 16:31:07 +05'30'

**( ज. आ. खवणेकर )**
शासनाच्या अवर सचिव

**प्रति,**

संचालक,
औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,
कामगार भवन, ५ वा मजला,
प्लॉट नं.सी-२०, ब्लॉक नं.ई, बांद्रा-कुर्ला संकुल,
बांद्रे (पू.) मुंबई-४०० ०५१.

**प्रत,**

१) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
४) महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य / मुंबई.
५) महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य / नागपूर.
६) निवडनस्ती (कामगार-१) उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई.